केंद्र पुरस्कृत पी. एम. जनमन या कार्यक्रमासाठी अनुसूचित जमाती उपयोजनेचा (TSP) पहिल्या हप्त्याचा निधी वितरित करणेबाबत (राज्य हिस्सा).

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- समग्र २०२४/प्र.क्र. ३४/ एसडी-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
विस्तार इमारत, मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक: ३१ मार्च, २०२४.

**वाचा :-**

१) वित्त विभागाचे क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि. १२.०४.२०२३ व दि. ०८.१२.२०२३ चे परिपत्रक
२) केंद्र शासन, शिक्षण मंत्रालय, नवी दिल्ली यांचे आदेश, क्र. १०-६६/२०२३ IS -१५ दि. १२.२.२०२४
३) राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांचे दि.२८.२.२०२४ रोजीचे पत्र.
४) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय, क्र. बीयुडी २०२४/ प्र.क्र. ५०/ कार्यासन-६, दि.१३.०३.२०२४.
५) शासन निर्णय, समक्रमांक, दि.२७.०३.२०२४.

**प्रस्तावना :-**

राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांनी संदर्भ क्र. ३ येथील पत्रान्वये पी. एम जनमन या योजनेच्या अंमलबजावणीसाठी केंद्र हिस्सा व राज्य हिस्सा निधी वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे.

२. सन २०२३-२०२४ च्या केंद्रीय अर्थसंकल्पामध्ये आदिम जमातीच्या (Particularly Vulnerable Tribal Groups (PVTGS)) उन्नतीसाठी प्रधानमंत्री जनजाती आदिवासी न्याय महाअभियान (PM JANMAN) या योजनेची घोषणा करण्यात आलेली होती. केंद्रीय मंत्रिमंडळाने या योजनेत मंजूरी दिलेली असून, याबाबतची घोषणा मा. पतप्रधान महोदयांनी भगवान बिरसा मुंडा यांच्या झारखंड या राज्यामधील खुट्टी या जन्मगावी दि.१५ नोव्हेंबर, २०२३ रोजी जनजाती गौरव दिवसाचे औचित्य साधून केलेली आहे. या योजनेमध्ये राज्यातील ११ जिल्ह्यामधील (चंद्रपूर, नांदेड, नाशिक, पालघर, पुणे, रायगड, रत्नागिरी, सातारा, सिंधुदुर्ग, ठाणे, यवतमाळ) कातकरी, कोलाम व माडींया गोंड या आदिम जमातीचा समावेश आहे. या आदिम जमातीमधील विद्यार्थ्यांना नियमित शिक्षणाची सोय उपलब्ध करून देण्याच्या दृष्टीने निवासी वसतीगृह तसेच व्यावसायिक शिक्षण आणि कौशल्य विकासासाठीच्या सुविधा उपलब्ध करून देण्यासाठी आवश्यक असणाऱ्या बाबी विचारात घेऊन तसा आराखडा तयार करून केंद्र शासनास राज्य प्रकल्प संचालक यांनी दि. २८.१२.२०२३ रोजी सादर केलेला आहे. या योजनेसाठी केंद्र व राज्य शासनाच्या हिस्स्याचे प्रमाण ६०:४० (केंद्र: राज्य) असे आहे.

३. केंद्र शासनाने संदर्भ क्र. २, दिनांक १२.२.२०२४ रोजीच्या आदेशान्वये या योजनेसाठी समग्र शिक्षा या योजनेच्या अनुसूचित जमाती (TSP) उपयोजनेखाली केंद्र हिस्सा रू. २४०.०० लक्ष इतका निधी मंजूर केला आहे. वित्त विभागाच्या अर्थोपाय शाखेने केंद्र हिस्सा निधी राज्य शासनाच्या एकत्रित निधीत जमा झाल्याबाबत ई-मेलद्वारे कळविले आहे. पी.एम जनमन या योजनेसाठी स्वतंत्र लेखाशिर्ष घेण्याची कार्यवाही सुरू आहे.

४. समग्र शिक्षा योजनेच्या अनुसूचित जमाती (TSP) उपयोजनेसाठी "मागणी क्रमांक टी-५, (२२०२आय६५७) (राज्य हिस्सा ४० टक्के) या लेखाशिर्षाखाली पुरेशी तरतुद शिल्लक नसल्याने केवळ केंद्र शासनाने वितरीत केलेला निधी समग्र शिक्षा या योजनेच्या अनुसूचित जमाती (TSP) उपयोजनेसाठी "मागणी क्रमांक टी-५, (२२०२ आय ६४८)

(केंद्र हिस्सा ६० टक्के) या लेखाशिर्षाखाली रू. २४०.०० लक्ष इतका निधी संदर्भ क्र. ५, दि. २७.०३.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आला आहे. यामुळे सदर योजनेच्या राज्य हिश्यासाठी रु. १६०.०० लक्ष इतका निधी आवश्यक असल्याने या विभागाकडील केंद्र शासन पुरस्कृत स्टार्स योजना या योजनेच्या २२०२ के ८५६ या लेखाशिर्षाखाली शिल्लक असणाऱ्या निधीतून पी.एम. जनमन या योजनेच्या राज्य हिश्यासाठी पुनर्विनियोजनाने रु. १६०.०० लक्ष इतका निधी मागणी क्रमांक टी-५, २२०२ आय ६५७ या लेखाशिर्षाखाली (राज्य हिस्सा ४० टक्के) उपलब्ध करून देण्यात आला आहे. सदर निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन आहे.

**शासन निर्णय :-**

केंद्र शासनाने उपरोक्त प्रमाणे उपलब्ध करुन दिलेल्या निधीच्या प्रमाणात वितरीत करावयाचा राज्य हिस्सा (४० टक्के) खालील विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांच्याकडे पी. एम जनमन या कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी या आदेशान्वये वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे. सदर विवरणपत्रातील स्तंभ क्र. ४ येथील वितरीत करावयाची तरतूद स्तंभ क्र. २ येथील लेखाशिर्षाकरिता मंजूर असलेल्या तरतूदीतून खर्च करण्यात यावी.

**रु.लाखात**

| अ. क्र. | लेखाशिर्ष | सन २०२३-२४ साठी पुनर्विनियोजनानंतरची तरतुद | वितरित करावयाची तरतुद |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | मागणी क्र. टी-५, २२०२, सर्वसाधारण शिक्षण,<br>०१, प्राथमिक शिक्षण, ७९६, जनजाती क्षेत्र उपयोजना,<br>(०१) जनजाती क्षेत्र उपयोजना<br>(०१) (११) समग्र शिक्षा अभियान (राज्य हिस्सा ४० टक्के)<br>(२२०२ आय ६५७), ३१- सहायक अनुदाने (वेतनेतर) | ११६६९.१६ | १६०.०० |
| | एकुण | | १६०.०० |

२. वित्त विभागाच्या शासन परिपत्रक दि. १२.०४.२०२३ मधील नमूद केलेल्या सर्व बाबींची पूर्तता होत आहे. सदर अनुदान सशर्त अनुदान असुन यापुर्वी वितरीत केलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्यात आले आहे. या अनुदानाच्या अटी व शर्ती सदर शासन निर्णयात नमुद केल्या आहेत.

३. सदर शासन निर्णयान्वये वितरीत केलेला निधी केंद्र शासनाचे दि. १२.२.२०२४ रोजीच्या आदेशामध्ये दिलेल्या निदेशानुसार व सन २०२३-२४ च्या वार्षिक कार्ययोजना व अंदाजपत्रक प्रकल्प मान्यता मंडळाने (PAB) मंजूर केलेल्या समग्र शिक्षा योजनेच्या चालू योजनांच्या आवर्ती/अनावर्ती बाबीसाठी खर्च करावा.

४. खर्चासंबंधीच्या सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखड्यानुसार याच वर्षात सदर निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी.

५. प्रधानमंत्री जनजाती आदिवासी न्याय महाअभियान (PM JANMAN) या योजनेचा खर्च हा Single Nodal Account (SNA) खात्यातून करण्यात यावा. अनुसूचित जमाती या लेखाशिर्षाखाली उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, लेखाशिर्षनिहाय / उप लेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्ट्ये इ. माहिती, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास विभाग व शालेय शिक्षण विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत न चुकता पाठवावी.

६. आदिवासी उपयोजना क्षेत्रात, आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

७. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदीतून आदिवासी उपयोजन क्षेत्रात पायाभूत सुविधा निर्माण करण्याबाबतच्या तसेच वैयक्तिक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात आणि आदिवासी उपयोजन बाह्य क्षेत्रात फक्त वैयक्तीक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात.

८. सदर खर्च वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि. १२.०४.२०२३ चे परिपत्रकामधील सूचनांनुसार करण्यात यावा. सदर निधी आहरीत करुन वितरीत करण्यासाठी अवर सचिव/ कक्ष अधिकारी (रोख/लेखा शाखा), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, यांना "आहरण व संवितरण अधिकारी" तर सह/उप सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय यांना "नियंत्रक अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. संबंधित आहरण व संवितरण अधिकारी यांनी निधी कोषागारातून आहरित करुन निधी समग्र शिक्षा यांच्या बँक खात्यात जमा करावा.

९. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे संदर्भाधिन दि.१२.०४.२०२३ व दि.०८.१२.२०२३ चे परिपत्रक व अनौपचारिक संदर्भ क्र. ४३३/२०२४/व्यय-१४, दि. ३१.०३.२०२४ आणि आदिवासी विकास विभागाचे परिपत्रक, दि. १३.३.२०२४ व अनौपचारिक संदर्भ क्र. ४४/२०२४/का.-६, दि.३१.३.२०२४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३३११८१८५६५२२१ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAMDAS GANPAT DHUMAL

Digitally signed by RAMDAS GANPAT DHUMAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT,
2.5.4.20=3246a8286e67ae7423b98bfd800865585eb8601521f097ab07142d65ea9b2b15, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=24F4ACDDCFF993441F6C634862546E9D122E0DB556806B179B794879ACF360F5, cn=RAMDAS GANPAT DHUMAL
Date: 2024.03.31 18:28:52 +05'30'

**(रामदास धुमाळ)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मंत्री (शालेय शिक्षण), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. प्रधान सचिव, (शालेय शिक्षण व क्रीडा विभाग) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
४. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
५. राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई.
६. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १/२ मुंबई, नागपूर.
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२ मुंबई/नागपूर.
८. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई-६३.
९. सर्व वरिष्ठ लेखा परीक्षक (शिक्षण विभाग).
१०. अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
११. उप सचिव (प्रशासन), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. वित्त विभाग, (व्यय-५/अर्थसंकल्प शाखा), मंत्रालय, मुंबई.
१३. अवर सचिव/कक्ष अधिकारी, लेखाशाखा, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४ . अवर सचिव (अर्थसंकल्प), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय , मुंबई.
१५. निवड नस्ती (एसडी-१).